**राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रम**
**महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण**
**संस्था, मुंबई- निधी वितरणाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एनिका-२०१४/प्र.क्र.१०६/आ-५,**
जी.टी.रुग्णालय आवार, कॉप्लेक्स बिल्डींग,
नवीन मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: १९ ऑगस्ट, २०१४.

**वाचा :**

१) **शासनाच्या नियोजन विभागाचे पत्र क्रमांक : केंपुयो२०१४/प्र.क्र.०८/का.१४१४, दि.१८जानेवारी, २०१४**
२) **केंद्र शासनाच्या एड्स नियंत्रण विभागाचे ज्ञापन क्रमांक :** Z14012/01/2013-NACO(Fin), दि. 4 एप्रिल, 2014.
३) **केंद्र शासनाच्या एड्स नियंत्रण विभागाचे पत्र क्रमांक :** Z14012/01/2013-NACO(Fin), दि. 30 एप्रिल, 2014.
४) **सार्वजनिक आरोग्य विभागाचा शासन निर्णय क्रमांकः एड्स-२०१४/प्र.क्र.८१/आ-५, दि. २८ मे, २०१४**
५) **महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्था, मुंबई यांचे पत्र क्रमांकः मराएनिसो/वित्त/२०१४-१५, दि.१६.०६.२०१४.**

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रम हा १०० टक्के केंद्र पुरस्कृत कार्यक्रम असून, सदर कार्यक्रम राज्यातील बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्र वगळता राज्यात इतरत्र ठिकाणी महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्था, मुंबई या शासकीय संस्थेमार्फत राबविला जातो. या संस्थेमार्फत राज्यात एड्स बाधीत रुग्णांकरीता एकात्मिक सल्ला व चाचणी केंद्रे (आयसीटीसी), प्राथमिक आरोग्य केंद्रे, एआरटी केंद्रे चालविली जातात. तसेच या केंद्रामध्ये रुग्णांना दिर्घकाळ एआरटी औषधे पुरविली जातात. देह विक्रय करणाऱ्या महिला (Female sex worker), स्थलांतरीत कामगार (Migrants), समलिंगी (Men having sex with men), ट्रक चालक (Truckers), शिरेवाटे मादक द्रव्ये सेवन करणारे (Injection drug user) आणि देह विक्रय करणाऱ्या स्त्रिया व समलिंगी संभोग करणारे (Core composite) यांना नियमित भेटी देऊन नियमित आरोग्य तपासणी व उपचार यासाठी समुपदेश केले जाते. एचआयव्ही संसर्गित रुग्णांना एआरटी उपचारासाठी संदर्भ सेवा दिली जाते. निरोधच्या वापराचे महत्व पटवून निरोध वापरण्यास प्रवृत्त केले जाते व निरोध वाटप केले जाते. यांसारख्या एड्स निवारण व जनजागृतिबाबत विविध योजना महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेमार्फत राबविल्या जातात. राज्यात ही योजना राबविण्यासाठी लागणारा निधी हा मागील वित्तीय वर्षापर्यंत (सन २०१३-१४) केंद्र शासनाच्या राष्ट्रीय एड्स नियंत्रण संस्थेकडून थेट महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेच्या खाती जमा केला जात होता. सद्यस्थितीत योजना आयोगाने नियुक्त केलेल्या बी.के.चतुर्वेदी समितीच्या शिफारशींना अनुसरुन केंद्र शासनाने सर्व केंद्र पुरस्कृत योजनांची पुर्नरचना ६६ केंद्र पुरस्कृत योजनांमध्ये केली आहे. या योजनांमध्ये महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेचा देखिल समावेश आहे. सदर अर्थसंकल्प बाह्य केंद्र पुरस्कृत योजनांचा (OBJ) निधी सन २०१४-१५ पासून राज्याच्या एकत्रित निधीद्वारे

संबंधीत यंत्रणांना वितरीत होणार असल्याचे नियोजन विभागाच्या वरील संदर्भ क्र. १ च्या पत्रान्वये कळविले होते व सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीद्वारे वाटप होण्याकरीता सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत नविन लेखाशिर्ष उघडण्याबाबत सूचना दिल्या होत्या. त्यानुसार सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत संदर्भ क्र. ४ येथे नमुद शासन निर्णयान्वये (२२१० एफ १४८- योजनांतर्गत) नवीन लेखाशिर्ष उघडण्यात आले आहे. केंद्र शासनाच्या एड्स नियंत्रण विभागाने चालू वित्तीय वर्षात (सन २०१४-१५) राज्यात एड्स नियंत्रण कार्यक्रम राबविण्यासाठी महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेस रु.१३०,११,५२,०००/- (अक्षरी रुपये एकशे तीस कोटी अकरा लक्ष बावन्न हजार फक्त) इतका निधी मंजुर केल्याबाबत केंद्र शासनाच्या संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये कळविले आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीद्वारे वाटप होणार असल्याने सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत उघडयात आलेल्या नवीन लेखाशिर्षाखाली (२२१० एफ १४८- योजनांतर्गत) राज्य विधानमंडळाने जून, २०१४ च्या अधिवेशनात सन २०१४-१५ या वित्तीय वर्षाच्या अर्थसंकल्पात रु.१३०.१२ कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यास मंजुरी दिली आहे. केंद्र शासनाने राज्यात एड्स नियंत्रण कार्यक्रम राबविण्यासाठी महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेस मंजुर रु. १३०,११,५२,०००/- इतक्या निधीपैकी रु. ५९,५४,२९,०००/- इतका निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा केला आहे. त्यापैकी रु.५९.५४ कोटी इतका निधी महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेस वाटप करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

या योजनांवरील खर्च भागविण्यासाठी तसेच महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण कार्यक्रमांतर्गत कार्यरत अधिकारी/कर्मचारी वर्गाचे वेतन व भत्ते यावरील खर्च भागविण्यासाठी महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेस सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात एकूण मंजुर रु.१३०.१२ कोटी इतक्या अनुदानापैकी रु.५९.५४ कोटी (अक्षरी रुपये एकोणसाठ कोटी चौपन्न लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे शासन मंजुरी देण्यात येत आहे.

सदरचा खर्च खाली दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षासाठी मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्र. आर-१**
२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६- सार्वजनिक आरोग्य
(१०१) रोग प्रतिबंध व नियंत्रण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
०१- रोग प्रतिबंध व नियंत्रण
१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना
(०१)(५५) राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रम
(१०० टक्के केंद्रीय हिस्सा)
३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)
(२२१० एफ १४८)

राष्ट्रीय एड्स नियंत्रण कार्यक्रमांतर्गत महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्थेस वितरीत निधीचा ताळमेळ राखण्यासाठी सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून व सदर

अनुदानाशी संबंधीत देयके अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च करु नये. खर्चाचा ताळमेळ घालून अहवाल तसेच उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे.

सदर शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाचे सहमतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२८७/२०१४/व्यय-१३, दि.१२/०८/२०१४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१९१७१९१३५२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sul Dnyandeo L

Digitally signed by Sul Dnyandeo L
DN: CN = Sul Dnyandeo L, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2014.08.20 16:29:23 +05'30'

**( ज्ञा. ल. सुळ )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य एड्स नियंत्रण संस्था, वडाळा, मुंबई.
२. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३. सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, लेखा व कोषागारे, मुंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. नियोजन विभाग (का. १४७२), मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग (अर्थसंकल्प) (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०. सार्वजनिक आरोग्य विभाग, (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
११. सार्वजनिक आरोग्य विभाग (लेखा), मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती (आ-५)